20101012142045001

प्रादेशिक योजना - नाशिक
मौजे गोवर्धन, ता. नाशिक येथील गट क्र. २८/२, ४२/१, ४३, ६३ व ६५ मधील ३८.५०९९ हेक्टर क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम २० (३) अन्वये फेरबदलाची सुचना..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. टिपीएस-१११०/२१५८/प्र.क्र.२६९/१०/नवि-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २७ सप्टेंबर, २०१०.**

**शासन निर्णय**:- सोबतची सूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, नाशिक.
४) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत सूचना शासनाच्या दि. १३ सप्टेंबर, २०१० रोजीच्या परिपत्रकातील निदेशानुसार व खालील सूचनांप्रमाणे जाहीरात म्हणून प्रसिद्ध करुन घेणेबाबत सत्वर कार्यवाही करावी.)

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जाहीरात देणाऱ्या कार्यालयाचे नांव | - | नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |
| २ | जाहीरात कोणत्या दिनांकापर्यंत द्यावयाची आहे. | - | तात्काळ |
| ३ | प्रसिद्धीचे स्वरुप | - | स्थानिक |
| ४ | कोणत्या जिल्ह्यात | - | नाशिक जिल्ह्यात |
| ५ | किती वृत्तपत्रात | - | एका मराठी व एका इंग्रजी वृत्तपत्रात |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | वृत्तपत्राचे नांव | - | सर्वाधिक खपाच्या वृत्तपत्रात |
| ७ | कितीवेळा | - | एकदा |
| ८ | जाहीरात खर्चाचे देयक कोणत्या अधिकाऱ्याकडे पाठवावयाचे त्याच्या कार्यालयाचे नांव व संपूर्ण पत्ता | - | संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

६) सहायक संचालक नगररचना, नाशिक शाखा, नाशिक.

(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तूत सूचनेच्या अनुषंगाने अधिप्रमाणित करण्यात यावयाच्या भाग नकाशाच्या पाच प्रती शासनास विहीत मार्गाने सादर करण्यात याव्यात.)

७) व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची सूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात नाशिक विभाग, भाग-एक पुरवणीमध्ये प्रसिध्द करण्यात येवून त्याच्या प्रत्येकी ०५ प्रती या विभागास, संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे व उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांच्याकडे पाठवाव्यात.)

८) कक्ष अधिकारी, (नवि-२९) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची सूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)

९) निवडनस्ती (कार्यासन-नवि-९)

****************

**सूचना**
**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**दिनांक - २७ सप्टेंबर, २०१०**

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६*

**क्रमांक:-टिपीएस-१११०/२१५८/प्र.क्र.२६९/१०/नवि-९:** ज्याअर्थी नाशिक प्रादेशिक योजना (यापुढे "उक्त प्रादेशिक योजना" असे संबोधिले आहे) शासन अधिसूचना क्र. आरपीओ-१०७४/१७७४९/नवि-५, दि. ८ मे, १९७८ अन्वये मंजूर झाली असून ती दि. १ जुलै, १९७८ पासून अंमलात आलेली आहे ;

आणि ज्याअर्थी उक्त प्रादेशिक योजनेत, मौजे गोवर्धन, ता. नाशिक येथील गट क्र. २८/२, ४२/१, ४३, ६३ व ६५ मधील ३८.५०९९ हेक्टर क्षेत्र (यापुढे ज्यास "उक्त क्षेत्र" असे संबोधले आहे) कृषी विभागात समाविष्ट आहे ;

आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे ज्यास "उक्त अधिनियम" असे संबोधले आहे) कलम-२० पोटकलम-(२) मधील तरतुदीनुसार उक्त क्षेत्र कृषी विभागातून वगळून खालील अटींवर रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे (यापुढे ज्यास "उक्त फेरबदल" असे संबोधले आहे) ;

**अट क्र.१)** फेरबदलाखालील जागेचा विकास करताना १०% अनिवार्य खुल्या जागेव्यतिरिक्त १०% अतिरिक्त सुविधा क्षेत्र प्रस्तावित करण्यात यावे. सुविधा क्षेत्राचे क्षेत्रफळ हे प्रचलित विकास नियंत्रण नियमावलीनुसार ठेवणे बंधनकारक राहील. सदर सुविधा क्षेत्र जमीन मालक / विकासक विकसित करु शकतील.

**अट क्र.२)** जिल्हाधिकारी, नाशिक यांनी विहीत केल्यानुसार सर्व सोयी सुविधा पुरविण्याची जबाबदारी जमीन मालक / विकासक यांची राहील.

आता, त्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम - २० पोटकलम (३) अन्वये शासन उक्त फेरबदल करण्याचा इरादा जाहिर करीत आहे व उक्त फेरबदलाच्या अनुषंगाने नागरिकांकडून हरकती व सूचना योग्य त्या कारणांसह, ही सूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांचे लिखीत स्वरुपात मागविण्यात येत आहेत. हरकती/सूचना उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांच्याकडे पाठविण्यात याव्यात. विहित मुदतीत सुचना/हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल सादर करण्याकरिता शासनातर्फे अधिकारी म्हणुन उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

उक्त फेरबदल दर्शविणारा नकाशा नागरिकांच्या अवलोकनार्थ खालील कार्यालयात कार्यालयीन वेळेत उपलब्ध आहे.

१) जिल्हाधिकारी, नाशिक.
२) उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
३) सहायक संचालक नगररचना, नाशिक शाखा, नाशिक.

**टिप:-** सदर फेरबदलाची सुचना विभागाच्या www.urban.maharashtra.Gov.in या वेब साईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे नावाने व आदेशानुसार,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032**
**Dated: 27th September, 2010.**

## NOTICE

***The Maharashtra Regional & Town Planning Act. 1966***

**No.TPS-1110/2158/CR-269/10/UD-9:** Whereas the Nashik Regional Plan (hereinafter referred to as the "said Regional Plan") has been sanctioned by Government vide Urban Development Department's Notification No. RPO-1074/17749/UD-5, dated 8th May, 1978 and which has came into force with effect from 1st July, 1978 ;

And whereas as per the proposal of the said Regional Plan, land bearing Gut Nos. 28/2, 42/1, 43, 63 & 65 of Mauje Govardhan, Taluka Nashik totally admeasuring 38.5099 Hectare, is included in Agriculatural Zone (hereinafter referred to as "the said Land") ;

And whereas the Government of Maharashtra is of the opinion that the said Land should be should be deleted from Agriculatural Zone and land so released should be included in Residential Zone subject to following conditions (hereinafter referred to as the "said Modification") as provided in sub-section (2) of section 20 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act No. XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") ;

**Condition 1)** While developing the land under modification, apart from 10% compulsary open space 10% additional amenity space should be provided. It is necessary that the area of this amenity space should be as per relevent Development Control Regulations. The owner / developer may develop this amenity space.

**Condition 2)** It is responsibility of the owner to provide all amenities as prescribed by the Collector, Nashik.

Now therefore, as provided in sub-section (3) of section 20 of the said Act Government of Maharashtra declares its intention to initiate the said Modification and invites objections and suggestions from the general public within 30 days from the date of publication of this notice in the Maharashtra Government Gazette. Suggestions / objections shall be addressed to the Deputy Director of Town Planning, Nashik Division, Nashik who is hereby appointed as the officer to hear the suggestions/objections received within stipulated period only and to submit report on it to Government;

The plans showing the said modification is kept open for inspection by the public during office hours on all working days at the following offices.

1) The Collector, Nashik.
2) The Deputy Director of Town Planning, Nashik Division, Nashik.
3) The Assistant Director of Town Planning, Nashik Branch, Nashik.

**Note:-** This Notice is also published on Government web site at www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

(Pradeep Gohil)
**Section Officer**